आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी करुन राज्याचे नाव उज्ज्वल केलेल्या महाराष्ट्र राज्यातील पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना रोख पारितोषिक देऊन गौरविण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांक:-संकीर्ण-१७२२/प्र.क्र.१३५/क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दि. ०२ मार्च, २०२३

**वाचा:**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : क्रीडायो २०१२ / प्र.क्र १५८/१२/क्रीयुसे - २; दि.०५.०२.२०१४.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक : राक्रीधो २०१८ / प्र.क्र १०३/क्रीयुसे - २; दि.११.१०.२०१८.
३. आयुक्त क्रीडा व युवक सेवा यांचे क्र क्रीयुसे/आंखेरोब/प्रस्ताव/२०२२-२३ /का-६ /५०४८ दि.२५.११.२०२२ रोजीचा प्रस्ताव

**प्रस्तावना-**

कैरो इजिप्त येथे संपन्न झालेल्या जागतिक नेमबाजी अजिंक्यपद स्पर्धेत १० मी. एअर रायफल मध्ये वैयक्तिक सुवर्णपदक मिळवून चि. रुद्रांक्ष पाटील यांनी पॅरीस येथे होणाऱ्या ऑलिपिक स्पर्धा २०२४ करिता नेमबाजी या प्रकारात भारतातर्फे पात्र होणाऱ्या प्रथम खेळाडूचा मान पटकावला आहे. चि. रूद्रांक्ष यांनी १० मी. एअर रायफल या प्रकारात जागतिक स्पर्धेत श्री अभिनव बिंद्रा यांचेनंतर १६ वर्षांनी भारतास सुवर्णपदक मिळवून दिले आहे. चि. रूद्रांक्ष यांनी केलेल्या नेत्रदिपक कामगिरीमुळे राज्याच्या गौरवात भर घातली गेली असल्याने मा. मंत्रीमंडळाने त्यांचे अभिनंदन करून त्यास राज्य शासनातर्फे रू. २.०० कोटी रकमेचा पुरस्कार देण्याचा ठराव पारित केलेला आहे. तसेच या स्पर्धेमध्ये श्री.किरण अंकुश जाधव, कु.अभिज्ञा अशोक पाटील, श्री.स्वप्निल सुरेश कुसाळे या तीन खेळाडूंनीही चमकदार कामगिरी केलेली असून , श्री.स्वप्निल सुरेश कुसाळे या खेळाडूने कास्य पदकाबरोबरच ऑलिपिक कोटाही मिळविलेला आहे . त्यामुळे मा. मंत्रीमंडळाने कु. रूद्रांक्ष पाटील या खेळाडूस रोख रक्कम देण्याबाबत केलेल्या घोषणेप्रमाणे इतर तीन पदक विजेत्या खेळाडू व त्यांचे क्रीडा मार्गदर्शक यांना देखील रोख पारितोषिक देऊन गौरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरण २०१२ अंतर्गत आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी तसेच राज्याचे नाव उज्ज्वल केलेल्या महाराष्ट्र राज्यातील पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयामध्ये तरतूद आहे. आता या शासन निर्णयामधील रोख बक्षीसाच्या

मर्यादेपेक्षा अधिकची रक्कम मा. मंत्रीमंडळाने केलेल्या ठरावाच्या पार्श्वभूमीवर एक विशेष बाब म्हणून देण्याचा निर्णय खालीलप्रमाणे घेतलेला आहे.

| अ.क्र | खेळाडूचे नांव | खेळ प्रकार | प्राप्त पदक | पारितोषिक रक्कम ( रुपये लाखात) | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | खेळाडू | मार्गदर्शक |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | चि. रूद्रांक्ष पाटील | १० मी. एअर रायफल **(वरिष्ठ गट)** | सुवर्ण - वैयक्तिक | १५०.०० | ७.५० |
| | | | सुवर्ण - सांघिक | ५०.०० | ७.५० |
| २ | श्री.किरण अंकुश जाधव | १० मी. एअर रायफल **(वरिष्ठ गट)** | सुवर्ण - सांघिक | ५०.०० | ७.५० |
| ३ | कु.अभिज्ञा अशोक पाटील | २५ मी पिस्तोल **(वरिष्ठ गट)** | रौप्य - सांघिक | ३०.०० | ५.०० |
| ४ | श्री. स्वप्निल सुरेश कुसाळे | ५० मी.रायफल थ्री पोजिशन **(वरिष्ठ गट)** | कास्य - सांघिक | २०.०० | २.५० |
| | **एकूण रक्कम** | | | ३००.०० | ३०.०० |
| | **अक्षरी रू.तीन कोटी तीस लक्ष फक्त** | | | **३३०.००** | |

२. उपरोक्त बाबीकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक ई-३,२२०४- क्रीडा व युवक सेवा १०४ क्रीडा व खेळ (०९) (०६) ऑलिम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्यांना रोख पारितोषिक देणे (२२०४ ५३२१)- ५० इतर खर्च" या लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्पित तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर बाब पुर्वोदाहरण म्हणून वापरता येणार नाही.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३०२१९११५५७९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramdas Ganpat Dhumal

Digitally signed by Ramdas Ganpat Dhumal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3246a8286e67ae7423b98bfd800865585eb8601521f097ab07142d65ea9b2b15, pseudonym=081ECC13959FDFAE420D6448809AEDBED849D484, serialNumber=24F4ACDDCFF993441F6C634862546E9D122E0DB556806B179B794879ACF360F5, cn=Ramdas Ganpat Dhumal
Date: 2023.03.02 19:15:34 +05'30'

**(रामदास धुमाळ )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६) मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय
७) प्रधान सचिव नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई .
८) प्रधान सचिव वित्त विभाग मंत्रालय, मुंबई
९) सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-
१०) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
११) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१५) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१६) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई-
१७) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती (क्रीयुसे-२).